# आठ हजार दगडं

चायनीज लोककथा



# आठ हजार दगडं

## चायनीज लोककथा

मराठी : अर्चना





खूप खूप वर्षा पूर्वी ची गोष्ट आहे. चायना मधे एक शक्तिमान राजा राज्य करत होता. तो चायना मधे सर्वात शक्तिमान होता आणि त्याचं नाव होतं त्स्याओ-त्साओ एक महान शासक म्हणून प्रसिद्ध होता.

लोयांग राज्यातीळ अतिशय सुंदर राजवाड्यात तो राहायचा त्याच्या राजवाड्याच्या भोवती सुंदर बाग होती. लोयांग एक संपन्न राज्य होत आणि स्वतः त्स्याओ एक भव्य आणि विशाल राजवाड्यात राहत असे. राजवाड्याच्या सर्व बाजुला बागा होत्या.

दहा हजार कर्तव्य दक्ष सैनिक राजवाड्याचे आणि राज्याचे दक्ष पणे रक्षण करत होते.



आजूबाजूच्या देशातले राजे आणि राजकुमार त्स्याओ त्स्याओ ची हि अदभुत नगरी, कर्तव्य दक्ष सैनिक  आणि सुंदर राजवाडा बघायला लोयांग येत असत. ते स्वतः येत किंवा आपले दूत पाठवत आणि त्यांच्या बरोबर त्स्याओ-त्स्याओ साठी किंमती भेट वस्तू सुद्धा पाठवत.



एक वर्षी भारताचे दूत लेयांग आले. त्यांनी त्यांच्या बरोबर त्स्याओ-त्स्याओ ला देण्यासाठी जगावेगळी भेटवस्तु आणली होती जी नाकधी त्स्याओ-त्स्याओ नी पाहिली होती ना कधी लेयांग वासीयांनी.



जसा त्या भारतीय दुताने लोयांग नगरीत प्रवेश केला लोयांग वासी आपला कामधंदा सोडून त्या अदभुत भेटवस्तु भोवती जमा झाले. राजवाड्यातील कर्मचारी आणि इतरही तिथे जमा झाले .

त्या नगरीमधे त्या अदभुत प्राण्याला बघण्यासाठी गर्दी जमा झाली आणि नुसता आरडा ओरडा आणि गोंधळ माजला.



त्स्याओ-त्स्याओ सुध्दा राजवाड्याच्या बाहेर आला, तो बाहेर येताच भारतीय दुताने त्याला झुकून नमस्कार केला, तिथे जमलेली प्रजा सुद्धा नतमस्तक होऊन उभी राहिली.

त्स्याओ-त्स्याओ ने भारतीय दुताला उठायचा आदेश दिला आणि विचारलं, “एव्हडा आरडाओरडा का चालु आहे माझ्या राज्यात? आणि हा विचित्र प्राणी कोणता?”

तेंव्हा तो दूत म्हणाला, “ महाराज ही भेट वस्तु आणली आहे, चीनच्या महान शासन कर्त्या त्स्याओ त्स्याओ साठी आमच्या राजानी हि भेट वस्तू पाठवली आहे. “

“अरे हो” राजा मनातल्या मनात बोलला भारताचा राजा नेहमीच अशी भेटवस्तु वर्षतून एकदा पाठवायचा.

“आम्ही प्रसन्न झालो” त्स्याओ-त्साओ दुताला म्हणाला, “तुमच्या राजाला सांगा तुमची भेटवस्तु आम्हला खूप खूप आवडली.

पण हे काय आहे? ह्या प्राण्याचे नाव काय?”

“महाराज हा हत्ती आहे.”

जुम्मा भारतीय दुताच्या मुलाने त्याचा खेळातला हस्तिदंती हत्ती दाखवला, त्स्याओ-त्साओ चा मुलगा पेई ह्याने जुम्माला आपली बोट दाखवली.

त्स्याओ-त्साओ ने विचारले, “आमचा हत्ती किती उंच आहे!”

चीनचे महान शासक, “हा दहा फुट उंच आहे.”

“आणि ह्याच वजन किती आहे ?”

“ओ महाराज ते मात्र आम्ही सांगु शकत नाही. भारतात ह्याच वजन करता येईल असा तराजु नाहीये.”

“म्हणजे तुमच्या राजाला सुद्धा त्याचे वजन माहिती नाहीये?”

”हो खरं आहे महाराज.”

राजाचे सेवक भारतीय दुतांना भोजन आणि विश्रांतिसाठी राजवाड्यात घेऊन गेले.

ते दुत आत जाताच त्स्याओ-त्साओ आपल्या दरबारातील लोकांना म्हणाला, “हे दुत एक महिना इथे राहतील त्याच्या आत मला ह्या हत्तीचं वजन जाणुन घ्यायचे आहे.”



“भारताच्या राजाला जमलं नाही ते त्स्याओ-
त्साओ चीनचा राजा आणि दहा हजार सैनिकांचा
अधिकारी करून दाखवणार.”



सगळे विचारात पडले ह्या हत्तीचं वजन कसं करायचं?

कोणालाच काही सुचेना. भारतीय दुतांना जायला फक्त एक आठवडा उरला होता.

सगळेच विचारात पडले होते.

एक दिवस बोटीशी खेळता खेळता पेई त्या सुंदर हत्तीपाशी गेला.

सगळे त्या हत्ती भोवती चिंतीत बसले होते.

त्याने विचारले, “हत्ती च्या जवळ बसून तुम्ही काय करता आहेत?”

ते म्हणाले, “विचार करतोय.”

“कसला  विचार?” पेई  ने विचारले.

ते म्हणाले, “हत्तीचं वजन कस करायचं ह्याचा विचार.”

पेई म्हणाला, “ते काही अवघड नाही.”

“काय?” दरबारी ओरडले.



“माझ्या मागून या हत्तीचं वजन करणं फारसं अवघड काम नाही मी सांगतो,” पेई म्हणाला.

असं म्हणून राजकुमार त्या दरबारातल्यामाणसांना एका तलावा जवळ घेऊन गेला.

त्या तलावात राजकुमार आपल्या बोटी बरोबर खेळत असे. त्या बोटीला एक रेष काढलेली होती.

“तुम्ही इकडेच थांबा,” असं म्हणून राजकुमार राजवाड्या कडे धावला.

तो पर्यंत दरबरी ती बोट उचलून हातात घेऊन निरीक्षण करू लागले.

त्या बोटीवर एक रेषा होती आणि चायनीज भाषेत हत्ती असे लिहिले होते.

“ह्याचा अर्थ काय?”

पण कोणालाही त्याचा अर्थ समजला नाही.

एव्हढ्यात राजकुमार राजवड्यातून बाहेर आला त्याच्या जवळ जुम्माचा हस्तिदंती हत्ती होता.

“बघा “तो म्हणाला आणि त्याने तो हत्ती बोटीत ठेवला. हत्ती ठेवताच ती बोट त्या रेषे पर्यंत बुडली,” तो म्हणाला बघितलेत जितक्या वेळा मी हत्ती बोटीत ठेवला तितक्या वेळा ही बोट त्या रेषे पर्यंत बुडली म्हणुनच मी तिथे  हत्ती असं लिहिलं , ह्याच प्रमाणे आपण त्या खऱ्या हत्तीचं वजन करू शकतो.

आपल्याला जर हत्तीचं खरं वजन पाहिजे असेल तर बोटीवरच्या रेषे पर्यंत बोट बुडेल इतके बोटीत दगडं टाकली पाहीजेत.

“वा-वा अगदी बरोबर ,हाच योग्य उपाय आहे,” सगळे दरबारी एकसाथ आनंदाने म्हणाले, “राजकुमार तुम्ही आम्हाला अगदी योग्य उपाय संगीतलात.”



ज्या दिवशी हत्तीचं वजन करायचं होतं त्या दिवशी सगळे दरबारी मोठ्या तलावाच्या काठी जमा झाले. तिकडचे नागरिक सुध्दा जमा झाले. हत्तीला एका मोठ्या बोटीतून आणले आणि राजकुमार आणि दरबारी लहान बोटीतून आले.



राजकुमाराने हत्ती असलेल्या बोटी वर बोट जिथं पर्यंत बुडली तिथे एक खुण काढली आणि लिहिले, “चीनच्या महान राज्यकर्त्यांचा हत्ती.”

दोन्ही बोटी किनार्यावर आल्या. हत्तीला किनाऱ्यावर उतरून मोठी बोट पुन्हा पाण्यात ढकलली, आता त्यात दगडं टाकायला सुरवात केली.

हजारो दगडं टाकल्यावर ती बोट त्या खुणे पर्यंत बुडली.

अंदाजे किती दगडं लागली पडतील हत्ती चे वजन करायायला सांगु शकाल?

8000 दगडं लागली हत्तीचं वजन करायला.

आनंदाने तुतारी वाजवून विजयाचा आनंद  साजरा केला.

घोषणा दिली की, “चीनच्या महान राज्यकर्त्यांच्या हत्तीचं वजन 8000 दगडं.”
सगळ्यांनी आनंदाने टाळ्या वाजवल्या .
चीनचे महान शासक लोयांग च्या राजाम्हणाला, “सगळ्यांना सूचित केलं जातंय की हत्तीचं वजन करण्याचा उपाय युवराजानी सुचवला होता.”
सगळ्यांनी परत टाळ्या वाजवल्या आणि जय जयकार केला.
“हि गोष्ट आमच्या इतिहासात लिहिली जाईल आणि त्याची एक प्रत भारतीय दूता बरोबर भारतात पाठवली जाईल,”
राजाच्या आज्ञेच पालन झालं. हा प्रसंग शाही इतिहासात लिहिला गेला.
राजकुमारच्या बुद्धिमतेचा त्यात उल्लेख केला गेला. एक प्रत भारतात पाठवली गेली.
ह्यामुळे चीनच्या लोयांग राजाची किर्ती अजून वाढली, केवळ विशाल राजवाडा आणि अफाट सैन्य म्हणून नाही तर त्याचा राजपुत्र पेई हा बुद्धिमान आणि हुशार आहे म्हणून.
काही वर्षांनी बुद्धिमान राजकुमार पेई चीन देशाचा सम्राट झाला.
हि 2000 वर्षा पुर्वीची आहे.

